

# ‘सांध्यपर्व’

*सांज आलीया दाराशी*
*तिचा केशरी श्रृंगार ....*
*माझं घर मुकं गाणं*
*त्याचं ‘ति’ला वेड फ़ार ....*

यजमान संपादक –
☆सचिन काकडे (मुंबई)

अतिथी संपादक –
☆अहं ब्रह्मास्मि ( घनश्याम पोटभरे )

सहसंपादक
☆सोनाली घाटपांडे ( पुणे )
☆आनंद माने (सोलापूर)
☆रेणूका रेपाळ ( अमेरिका )
☆नाम गुम जायेगा ( ठाणे )
☆सुरुचि नाईक ( नागपूर )
☆स्वप्ना कोल्हे (नाशिक)

अनुदिनी रुपांतर
☆सचिन काकडे

## संपादकीय

अंगावरला उन्हाचा साज उतरवुन समोर आली यौवना
म्हणालो सांज तिला...
नको छळू मनास, आवर पदरास..
वारा कुजबुजला सांग तिला !!
तु अशी येताना, थरथरताना....
सावल्या का गं सभोवती ?
तयांचे फ़ितूर गीत, कहानी तयांची
का तुला गं माहीत नव्हती ?
तुझा स्पर्श सांगतो असे मला की ...
तुज रात व्हायचे आहे...
तु रात हो, वा पहाट हो तु
मज तुझे व्हायचे आहे
तु कशास चोरते अंग, मनाचा रंग
कसलासा हा गं बहाणा... ?
ओठावर फ़ुलते गीत, बहरते प्रीत...
तु ये अशी.. गं तु मिठीत ये ना ?

क्षितीजावरला भगवा रंग ... आठवांचा
निवांत संग
मुस्मुसणारी कातरवेळ ... अल्लड खुळा
साऊल खेळ
ऒंजळीतली चार किरणं ... त्यांनीही नंतर
अलगद झरणं
झरतानाची ओली भाषा.... कळती बोल,
कळे गीत अताशा
सैरभैरसा मुका पारवा....डोळ्यात अगदी
तसा गारवा
गारव्याचा रंग सावळा... संध्येचा हा
असा सोहळा
सोहळ्यात मनाला सुचले गीत... गात
शिरावे तिच्या कुशीत...

अश्याच काही गीतांची संध्येस वाहिलेली ही ओंजळ...
यात रंगून ती रात होईल ... पहाट हॊईल... सकाळ ही होईल

पण तिचं ‘सांज’ हे शांत निवांत स्वरूप मनाला
नेहमीच आठवत, भुलवत आणि खुलवत राहील.
तिचा नभ रंगवण्याचा सावळा सोहळा
असाच खुल्या, ओल्या मनानं पहावा...
अन शब्दातून उधळत जावा .....

**- सचिन काकडे**

## ..कुठे दूरवर ( भावानुवाद )..

कुठे दूरवर दिवस मावळे
संध्याराणी लाजून रंगे
अलगद सजगे
प्रांगणात माझ्या सुषुप्तीच्या
कोण चेतवी दिप स्वप्नांचे
दिप स्वप्नांचे

कुठे कधी हे मन ना वळते
कुठे जुळे जन्मांचे नाते
गूढ हे कोडे
मन हे वेडे
असून स्वतःचे
दुःख साही परक्याचे
साही परक्याचे

कधी जड झाले श्वास ही माझे
डबडबले कधी नयन हे माझे
मंद मंद हे
कुणी गोंजारी
स्पर्श करी
पण दिसे न कोठे
दिसे न कोठे

**- नाम गुम जायेगा**

## ..सांज..

दिस गेलाय सरुन
सांज आलीया भरुन
पक्षी चालले उडत
घरी माघारी फिरुन

क्षितीजाच्या पलीकडे
दडी मारीतो अरुण
चांदण्या या डोकावती
ढगामागून चोरुन

वेगे धावते वासरु
माय आलीया चरुन
हंबरडा फोडी गाय
कास आलीया भरुन

लुप्त झाल्या या सावल्या
जाती पाऊल चोरुन
आता जाईल उजेड
होई काळोख तरुण

झोपतील पशू पक्षी
झाडे झोपती चोरुन
थंड झाले सारे जग
अंग येई मोहरुन

**- हरीश दांगट**

## ..कातरवेळ..

कातरवेळ भिरभिरते
भरल्या घरात शिरते
हुरहुरते अन
एकट्याच्याच मनात संधिप्रकाश कालवते
सगळयांचे डोळे चुकवत
एक अश्रू पापणीत येतो,थबकतो
दूरवर कुठेतरी वाजणारी व्हायोलीन समेवर आली
की मग..
गालांवरुन घसरतो..घरभर पसरतो..

**- सचिन जायभाये**

## ..सांज आताच..

सांज आताच लागे सरु
अन बहाणे तुझे का सुरु

पावले जाणती आपली
येथुनी मागुते ना फिरु

हेलकावे मनाला किती
तू नको ना बटा सावरु

डाव हातातला हा हरु
(अन शहाणेच दोघे ठरु!)

थांब ना थांब ना थांब ना
चांदणे लागले वावरु
या उद्याच्या स्मृतींना,सखे
भारलेल्या क्षणांनी भरु

**- शार्दूल व्यास**

## ..सांजकविता ..

आज सांज झुरते आहे
एकलीच सरते आहे
रितं रितं आकाश,पण..
मनात ती उरते आहे

क्षितीजाचे रक्तिम कुंकू
तिचं मळवटच जणू
नवरंगी स्वप्न लेवते
मुक्तछंदी सांजच जणू

पापण्यांत स्वप्नलाटा
कड किंचीत ओलावते
आकाशाला पुसून डोळे
मन अलगद सैलावते

**- अभिजीत गलगलीकर**

## ..बेकार(एक दिनचर्या)..

संध्याकाळ सारी मित्रांसंगे
गप्पा गप्पांत सरुन जाते

रात्र सारी स्वप्नांमध्ये
सजून धजून विझून जाते

सकाळ ताजी वर्तमानपत्रात
भविष्य शोधून थकून जाते

दुपार मात्र पायात पेटुन
संध्याकाळची वाट पहाते

संध्याकाळची वाट पहाते

**- भूषण महाजन ( भूराम )**

## सांज बावरी

कुठे दूर
अस्तास सुर्य अन
हळूच बावरी, सांज चोरटी
आस-यास येई मम ह्रदयी

घेऊन सवे
स्वप्न थवे
उजळती तारकादीप नभी

एक स्वप्न,
एक दीप
सडे दिव्यांचे मम ह्रदयी

आठवांच्या दीपमाला... अन ती,
कृष्णसावळी सांज लाजरी
बिलगूनी मजला स्वतःसवे ती
नेई अलवार पैलतीरी

**- अनुराग कौशिक**

# भेट -चांदण्यांचा गाव

तिच्या चाहुलीचे सुर
मघा तळ्यावरी आले
पाण्यासवे ओले स्वर
कसे खुळ्यापरी झाले... ?

वारा खूणावुनी गेला
उगा अंधार केला
चाळीती नजर सावल्या
वार हळुवार केला

डोळे मिटूनी निघालो
पाखरे सोबतीला आली
गीत सुचले पंखांना
वाट नादावली, निघाली

स्वर ओठावर होते
सारे तिच्याच उन्हाचे
काही आठवित होतो
काही गायलो मनाचे

उभी सांज उंब-याशी
मीही दारावर आलो
तिची प्रीत अंगणाशी
नभा सांगतो म्हणालो

उगा बावरणे झाले
मग सावरणेही झाले
गाली लाजता लाजता
उगा रागवणेही आले

ती हसत म्हणाली
‘सांगतोस...मग
सांग ‘गीत’ प्रेमाचे त्या नाव
भेट प्रीतीची म्हणोनी
रोज देईन चांदण्यांचा गाव’

**- सचिन काकडे**

## ।। अतिथी संपादकांच्या लेखणीतून ।।

वाचनाचा अतोनात नाद आहे पण कविता क्वचितच वाचल्या असतील. कवितेकडे अपघातानेच वळलो . २००७ मध्ये ऑरकूट जॉईन केल्यानंतर एका कॉमवर ‘आवडत्या कविता पोस्ट करा‘ असा टॉपिक पाहिला. मला कुठल्याच पाठ अशा नव्हत्या. मग विचार केला आपणच करून पाहूयात आणि कविता जुळवून टाकू लागलो तिथे. बघता बघता इतके वेड लागले की रोज एकतरी टाकल्याशिवाय चैन पडेना. तिथल्या मित्रांनीही खूप प्रोत्साहन दिले आणि बघता बघता चक्क कवी झालो वयाच्या ४२ व्या वर्षी .

ऑरकूटबद्दल पेपरला काहीबाही येते म्हणजे गुन्हे — फसवाफसवी वगैरे . ते खरेही असेल पण मला वाटते कोणत्याही गोष्टीचा आपण कसा वापर करतो त्यावर सगळे अवलंबून आहे .

माझ्या आयुष्यात ऑरकूटमुळे खूपच सकारात्मक बदल घडले .

अनेक छान मित्र मिळाले

मी कॉम्प्युटर प्रोग्रामिंगचे काम करतो . अध्यात्माची विशेष आवड आहे. प्राणायाम ध्यान रोज करतो. गेली ५ वर्ष आयुष्यातला कठीण काळ होता आणि त्यामधून फक्त कविता, अध्यात्म आणि माझे मित्र यांमुळेच तरलो असे मला वाटते .

**- अहं ब्रह्मास्मि**
**( घनश्याम पोटभरे )**

## सांज भाळली

नभ लाजरे गोजरे
सांज पाहून भाळली
तिचे पाऊल निघेना
तिथे जरा रेंगाळली

वारा झुळूझुळू वाहे
पाने हासती नाचती
दूर कोठे दरीखोरी
सूर चंदनी वाजती

मेघ अबोली रंगाचे
फुले बरी गज-यांना
नदी चाले डौलदार
कधी माळुन तयांना

पाखरांची झाली आता
घरी निजायाची वेळ
वारा अंगाई म्हणतो
सारा शांत शांत माळ

नभ-धरेच्या छायेत
आज तरारले रान
क्षितीजाच्या शपथेने
परी दोघांनाही भान

**- अहं ब्रह्मास्मि**

नेटाक्षरी हा अंक विनामूल्य वितरीत केला जातो.
आपल्या सुचना ,टीका आणि सहकार्य यांचे स्वागत आहे .
netaksharee@gmail.com